# गोवा क्रांती दिन १९९९

गोव्याच्या वैविध्यपूर्ण इतिहासांत गोवा क्रांतिदिनास अनन्य-साधारण महत्व आहे. गोव्याच्या स्वातंत्र्याची पहाट क्रांतीदिनाच्या किरणाने उगवली. १८ जून १९४६ रोजी थोर स्वातंत्र्य सेनानी आणि राष्ट्रीय नेते डॉ. राम मनोहर लोहिया यांनी गोमंतभूमीत गोव्यातील पोर्तुगीज राजवटीला उघड आव्हान देऊन गोमंतकीयाना वसाहतवादी सत्तेविरूद्ध लढा देण्याची हाक दिली. त्याचेच स्मरण आम्ही प्रत्येक वर्षी १८ जून रोजी क्रांती दिन साजरा करून करतो.

मडगांव शहराच्या मध्यवर्ती ठिकाणी असलेल्या चौकाला ज्याला आज डॉ. राम मनोहर लोहिया चौक म्हणून ओळखण्यात येते, त्या चौकात ५३ वर्षापूर्वी आयोजित जाहीर सभेत पोर्तुगीज सत्तेला उघड आव्हान देऊन डॉ. लोहियानी गोव्याच्या मुक्ती लढ्याच्या अंतिम टप्प्याचे रणशिंग फुंकले. डॉ. लोहियांच्या हाकेला सर्व जाती-धर्माच्या आणि सर्व थरातील लोकांनी प्रतिसाद देऊन गोव्याच्या मुक्ती लढ्यात स्वत:ला झोकून दिले.

गोवा मुक्तीसाठी आपले सर्वस्व अर्पण केलेल्या स्वातंत्र्यसैनिकांना आणि हुतात्म्यांच्या स्मृतिला उजाळा देण्यासाठी आणि गोव्याच्या मुक्ती लढ्याचे स्मरण करण्यासाठी क्रांती दिन साजरा करण्यात येतो.

या क्रांती दिनी स्वातंत्र्यसैनिकांना सन्मान करण्यात येतो. गोव्याच्या मुक्ती लढ्यात योगदान दिलेल्या सर्व ज्ञात-अज्ञात हुतात्मे आणि स्वातंत्र्यसैनिकांना भावपूर्ण श्रद्धांजली या क्रांती दिनी वाहण्यात येते.

या वर्षाच्या क्रांतीदिनी माननीय मुख्यमंत्री श्री लुईझिन फालेरो यांच्या हस्ते १४ जणांचा मरणोत्तर व २६ हयात स्वातंत्र्यसैनिकांचा सन्मान करण्यात येईल.

स्वातंत्र्य सैनिकांना विनम्र अभिवादन.

१८ जून १९९९.

# दिवंगत



## स्व. आंतोनियो व्हिएगस

स्व. आंतोनियो व्हिएगस हे सासष्टी तालुक्यातील करमणे येथील असून ते स्वत: मुक्ती चळवळीत सामील झाले. १९४६ साली राम मनोहर लोहिया गोव्यात होते तेव्हा त्यांनी मडगांव येथे भाषण केले. त्यांना पोर्तुगीज पोलीसांनी अटक केली व नंतर त्यांची सुटका करण्यात आली.

त्यांनी बेळगांव येथून पोस्टर, पत्रके आणून ती गोव्यात वाटली.

१९५४ साली त्यांनी करमणे येथील निवासस्थानी अटक झाली आणि ५ वर्षे कठोर तुरुंगाची शिक्षा करण्यात आली. ४ वर्षानंतर त्यांची सुटका झाली. बाहेर जाण्यासाठी त्याने नकार दिला. आणखी एक वर्षाची त्यांना शिक्षा झाली.

डॉ. गायतोंडे, खिस्तो फुर्तादु, नागेश करमली, पांडुरंग मुळगांवकर हे त्यांचे इतर सहकारी होते.

८ मार्च १९६८ साली त्यांचे निधन झाले.



## स्व. दत्ताराम कृष्णराव देसाई



स्व. दत्ताराम कृष्णराव देसाई यांचा जन्म डिचोली तालुक्यातील साखळी येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण मराठीतून झाले. ते नॅशनल काँग्रेस गोवाचे सदस्य होते. त्यांची दोडामार्ग येथून बाळकृष्ण जोशी यांनी पुरविलेली पत्रके, पोस्टर वाटली आणि चिकटवली. १९५४ साली त्यांना अटक झाली. त्यांना ट्रिब्युनलासमोर उभे ठेऊन १८ महिन्याची तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९५६ साली त्यांची सुटका झाली. सुटका झाल्यानंतर त्यांनी राष्ट्रीय कारवायात सहभागी होण्याचे चालूच ठेवले.

१९७२ साली केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

शिवाजी देसाई, शिवनाथ हिंदे, आणि आपा गांवकर हे त्याचे सहकारी होते.

ते व्यवसायाने शेतकरी होते.





# स्व. गजानन प्रभूदेसाई

स्व. गजानन प्रभृदेसाई यांचा जन्म काणकोण तालुक्यातील खोला येथे झाला. त्यांचे लार्यासियम शिक्षण झाले. ते "आवाज द इंडिया" या पोर्तुगीज दैनिकाचे उपसंपादक होते. या दैनिकातून राष्ट्रवादी विचार प्रसिध्द करीत. १९५५ साली पोर्तुगीज सरकारने या दैनिकावर बंदी आणली. त्यांना अटक करून सहा महिने तुरुंगवासात ठेवण्यात आले. सुटका झाल्यानंतर ते बेळगाव येथे गेले आणि तेथून त्यांनी आपल्या राष्ट्रवादी कारवाया चाल़ूच ठेवल्या. मे १९५० साली त्यांची नॅशनल कॉग्रेस गोवाच्या (बेळगांव शाखा) कार्यकारी समितीवर सदस्य म्हणून नियुक्ती झाली. १९५५ साली ते आझाद गोमंतक दलात सामील झाले. स्वातंत्र्य मिळेपर्यंत आझाद गोमंतक दलाच्या "आझाद गोवा रेडिओ" या भूमीगत स्टेशनवरून राष्ट्रवादी कारवायांचा प्रचार करण्याचे त्यांनी कार्य केले.

आर्मादो सांतान परेरा, लुईस मेंडिस, वसंत पांडुरंग बोरकर हे त्याचे सहकारी होते.



## स्व. कुमुदचंद्र वासुदेव प्रभूदेसाई



स्व. कुमुदचंद्र वासुदेव प्रभूदेसाई यांचा जन्म ५ सप्टेंबर १९१९ साली सासष्टी तालुक्यातील कुंक्कळी येथे झाला. त्यांनी प्राथमिक शिक्षण पोर्तुगीज तर माध्यमिक शिक्षण इंग्रजी भाषेत घेतले. मुक्ती चळवळीच्या काळात ते नॅशनल कॉंग्रेस गोवाचे सदस्य होते. त्यांनी पत्रके वाटण्याची कामे केली. त्यांनी मुख्य स्वातंत्र्यसैनिकांना माहिती दिली आणि गुप्त बैठकात ते सहभागी झाले. १९५६ साली ऑल्विन कुयेलो यांच्या नेतृत्वखाली तेरेखोल येथे सत्याग्रह केला. त्यांना अटक करुन ५ वर्षे तुरुंगवास आणि दोन वर्षांची शिक्षा ठोठावण्यात आली. तसेच त्यांना १५ वर्षे राजकीय हक्कापासून वंचित करण्यात आले. त्यांना त्यांचे दुकान बंद ठेवण्यात सांगितले. प्रत्येक दिवशी पोलीस स्टेशनवर येऊन हजेरी लावण्याच्या अटीवर त्यांचा सुटका करण्यात आली.

१९७६ साली केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

मुक्तीनंतर अनेक सामाजिक-धार्मिक आणि इतर संघटनेत त्यांचे संबंध होते. अष्ठग्रहर मंडळ कॉंग्रेसचे ते अध्यक्ष होते. ते रिवण ग्रामपंचायतीचे सदस्य होते.

माधव बीर, राम काकोडकर, कृष्णकांत हेगडेदेसाई, माधव पंडित, कृपावंत लांजेकर आणि राघोबा मळीक हे त्याचे सहकारी होते.

ते व्यवसायाने शेतकरी होते.





## स्व. लुईस गाब्रियल मेंडिस

स्व. लुईस गाब्रियल मेंडिस यांचा जन्म ४ ऑगस्ट १९१६ साली सासष्टी तालुक्यातील वेळ्ळी येथे झाला. त्यांनी एल. एल. बी. शिक्षण घेतले. ते इंडियन नॅशनल काँग्रेसचे सदस्य होते आणि त्यानंतर ते नॅशनल काँग्रेस गोवाचे सदस्य झाले. ते भारत छोडो चळवळीत सहभागी झाले. १९३७-४० पर्यंत ते गोमंतक प्रजा मंडळाचे सचिव होते. १९४० साली त्यांनी गोमंतक या इंग्रजी नियतकालिकेचे संपादन केले आणि १९५४ साली मुंबई येथून प्रकाशित होणारे "गोवा" या नियतकालिकेत त्यांनी कोकणीतून लेख लिहिले. तरुणामध्ये राजकीय जागृती निर्माण करण्यासाठी त्यांनी कार्य केले. त्यांच्याविरुध्द अटक वॉरंट काढण्यात आले. त्यांच्या घरावर तीन वेळा धाड घालण्यात आली. मॅरीटाईम लेबर युनियन ऑफ इंडियाचे ते संस्थापक सदस्य आणि सरसचिव होते. गोवन क्लब फेडरेशन बॉम्बेचे ते सरसचिव होते.

मुक्तीनंतर गोवा (टॉडी-टॅपर) रेंदेर संघटनेचे ते संस्थापक सदस्य आणि सरसचिव होते.





## स्व. नामदेव विनायक रायकर

स्व. नामदेव विनायक रायकर यांचा जन्म ३० डिसेंबर १९३५ साली मडगांव येथे झाला. त्यांचे मराठीतून माध्यमिक आणि नॉन मॅट्रिक शिक्षण झाले. १९५४ साली ते नॅशनल कॉंग्रेस गोवाचे सदस्य झाले. १९५५ साली ते गोवा लिबरेशन आर्मीचे सदस्य झाले. त्यांनी सत्याग्रहींच्या बैठ़का घेतल्या. पत्रके वाटली. सासष्टीत तिरंगा फडकावला. मे १९५६ साली व्यंकटेश कुंदे यांच्या मदतीने वेळ्ळी येथील पोर्तुगीज शाळेला त्यांनी आग लावली. आगगाडीच्या डब्यात टाईम बॉम्ब ठेवले. या टाईम बॉम्बचा चांदोर-मडगांव दरम्यानच्या रेल्वे स्टेशनवर स्फोट झाला. जून १९५६ साली मडगाव पोलीस स्टेशनवर बॉम्ब ठेवला. स्फोटकांद्वारे लहान पूल उध्वस्त केले. टेलिफोनच्या वायर कापल्या. पोर्तुगीज मिलिटरी व जीपवर हातबॉम्ब फेकले. सीमा पार करून शिबिरास हजर राहिले. १३ ऑगस्ट १९५६ या साली त्यांना अटक झाली. तुरुंगवासात त्यांचा दोन महिने छळ करण्यात आला. १९५८ साली त्यांना ट्रिब्युनलासमोर उभे करून २४ वर्षे कठोर तुरुंगवासाची शिक्षा ठोठावली. आग्वाद तुरुंगवासात त्यांना साडेपाच वर्षापेक्षा अधिक शिक्षा झाली. त्यांची मुक्तीदिनी सुटका झाली.

भारत सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

वसंत कारापुरकर, गोपाळ विर्जीनकर आणि डॉ. घनश्याम कंटक हे त्यांचे सहकारी होते.





# स्व. सूर्यकांत विठ्ठल थळी

स्व. सूर्यकांत विठ्ठल थळी यांचा जन्म २९ जुलै १९२९ रोजी बार्देश तालुक्यातील हणजुणे येथे झाला. त्यांची मॅट्रीकपर्यंतचे शिक्षण घेतले. ते नॅशनल काँग्रेस गोवाचे सदस्य होते. १९४६ साली त्यांनी राष्ट्रीय चळवळीत भाग घेतला. २८ ऑक्टोबर १९४६ साली त्यांची म्हापसा येथे आपल्या सहका-यांबरोबर सत्याग्रह केला. तेव्हा त्यांनी अटक करून तुरुंगवासात डांबण्यात आले. त्यानंतर सुमारे दहा दिवसांनी त्याची सुटका करण्यात आली. त्यांनी भूमिगत कारवाया चालूच ठेवल्या. ऑगस्ट १९५४ साली कुळे रेल्वे स्टेशनवर त्यांना पुन्हा अटक करण्यात आले आणि बावीस दिवस त्यांना पणजी पोलीस चौकीत ठेवण्यात आले. त्यानंतर त्यांनी बेळगांव येथे पिटर आल्वारीस यांच्या मार्गदर्शनाखाली कार्य केले. त्यानी बेळगांव येथून पोस्टर आणि पत्रके आणून ती गोव्यात चिकटवली आणि त्यांनी तरुणामध्ये राजकीय जागृती निर्माण करुन त्यांना सत्याग्रहात सहभागी होण्यास तयार केले. २६ जानेवारी १९५५ रोजीं त्यांना बाळा काकोडकर यांच्यासोबत परत अटक करण्यात येऊन १० वर्षे तुरुंगवासाची शिक्षा झाली.

१९५९ साली त्यांची सुटका झाली.

१९७२ साली केंद्र सरकारने ताम्रपट देऊन त्यांचा सन्मान केला.



## स्व. शिवनाथ बाबूली हिंदे



स्व. शिवनाथ हिंदे हे साखळी येथील असून तरुण वयातच त्यांनी मुक्ती चळवळीत भाग घेतला.

त्यांनी पोर्तुगीज तसेच मराठीतून शिक्षण घेतले.

त्यांनी गोव्याबाहेरून पोस्टर, ध्वज आणि इतर राष्ट्रवादी साहित्य आणून ते गोव्यात वितरीत केले. तसेच त्यांनी गोव्यात पोस्टर चिकटविण्याचे काम केले.

ऑक्टोबर १९४५ साली मोन्तेरो यांनी त्यांना त्यांच्या साखळी येथील निवासस्थानी अटक केली. न्यायालयाने त्याना ११ वर्षाची तुरुंगाची शिक्षा ठोठावली.

त्यांना ११ महिने आणि १३ दिवस तुरुंगात रहावे लागले.

श्री हिंदे याचे १९७२ साली निधन झाले.





## स्व. तुकाराम राघोबा काणकोणकर

स्व. तुकाराम राघोबा काणकोणकर यांचा जन्म ३१ जुलै १९३१ रोजी तिसवाडी तालुक्यातील पाळे शिरदोन येथे झाला. त्यांनी मराठीतून माध्यमिक शिक्षण, तीन वर्षे लायसीयम शिक्षण आणि मॅट्रीकपर्यंतचे शिक्षण घेतले. ते नॅशनल काँग्रेस गोवाचे सदस्य होते. त्यांनी मिरवणुका काढल्या. बैठका घेतल्या. तसेच बातमी पत्रे वाटली. ते नॅशनल काँग्रेस गोवाच्या प्रचार समितीचे सदस्य होते. एप्रिल १९४७ साली आझाद गोमंतक दलाचे ते संस्थापक सदस्य होते. पोलीस आऊट पोस्टवर धाडी घालण्याच्या कार्यात ते सहभागी झाले होते. म्हापसा तिजोरीवर धाड घालण्याची तयारी केली आणि २१ जुलै १९४७ साली विश्वनाथ लवंदे आणि इतर सहका-यांसमवेत त्यांनी म्हापसा तिजोरीवर धाड घातली. ४ डिसेंबर १९४७ रोजी "बॉको नॅशनल अल्ट्रामरीनो" च्या व्यवस्थापकावर हल्ला करण्याच्या कार्याचे ते सुत्रधार होते. त्यांनी व्यवस्थापकावर हल्ला करुन पैसे जप्त केले. अटक चुकविण्यासाठी ते दोडामार्ग येथे गेले तरी त्यांनी राष्ट्रीय कारवायात सहभागी होण्याचे चालूच ठवले. म्हापसा न्यायालय आणि पणजी न्यायालयाने त्यांच्या गैरहजेरीत त्यांच्यावर खटला भरला आणि १२ जून १९५० साली त्यांना २८ वर्षे कारावासाची शिक्षा झाली आणि एक वर्षपर्यंत प्रतिदिनी २० इस्कुद दंड फर्माविला. त्यांच्याविरुध्द अटक वॉरंट काढण्यात आले. तो कुठे आहे ही माहिती मिळविण्यासाठी त्यांच्या वडिलांना अटक करुन त्यांचा छळ केला. त्यांची मालमत्ता जप्त करण्यात आली. ते भारत सरकारला पोर्तुगीज सरकारच्या कारवाईची माहिती देत होते.

१९७२ साली केंद्र सरकारने त्यांना ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला. व्ही. एन. लवंदे, दत्तात्रय देशपांडे, प्रभाकर सिनारी, नारायण हरी नायक, पांडुरंग शिरोडकर, मधुसुदन शिरोडकर आणि सिंगबाळ हे त्यांचे सहकारी होते.

# स्व. वामन बाळकृष्ण सरदेसाई



स्वर्गीय वामन बाळकृष्ण सरदेसाई यांचा जन्म २५ मे १९२३ रोजीं फोंडा तालुक्यातील वाडी या गावात झाला. त्यानी लायसियम शिक्षण घेतले. तसेच त्यांनी एक वर्ष वैद्यकीय शिक्षण घेतले. त्यानी राष्ट्रवादी प्रचाराचे कार्य केले. पणजी येथील महालक्ष्मी मराठी शाळा, कन्याशाळा आणि मॉर्डन हायस्कूलान घेतलेल्या गुप्त बैठकांना हजर राहीले. ज्वाला पत्रकाचे वितरण आणि भूमिगत कारवाईसाठी त्यांना डिसेंबर १९४७ साली अटक करण्यात आली. त्यांना ट्रिब्युनलासमोर उभे करून ७ महिने साधी कैदेची शिक्षा झाली आणि ५ वर्षापर्यत राजकीय हक्कापासून वंचित करण्यात आले. १९५५ साली मुंबई आकाशवाणीवरून कोंकणी आणि पोर्तुगीज कार्यक्रमाचे ध्वनिक्षेपण करण्यासाठी प्रा. फ्रांसिस्को कुरैया यांच्याबरोबर कार्य केले. त्यांनी गोवा मुक्तीपर्यंत रेडिओवरून कार्यक्रमाचे ध्वनिक्षेपण करण्याचे कार्य चालूच ठेवले.

ऑक्टोबर १९६१ साली नवी दिल्ली येथील पोर्तुगीज राजवट प्रदेशाच्या प्रतिनिधीच्या आंतरराष्ट्रीय परिषदेत सहभागी झाले. "ऑपरेशन विजय" कारवाईवेळी गोव्यात वाटण्यासाठी पत्रके तयार करण्यास त्यांनी मदत केली. मिलीटरी कारवाईत जप्त केलेली महत्वाची कागदपत्रे इंग्रजीतून भाषांतरीत केली.

मुक्ती चळवळीच्या काळात ते शिक्षक होते. त्यानंतर ते सरकारी सेवेत रूजू झाले. निवृत्तीनंतर ते "गोवा टुडे" या मासिकाचे संपादक होते.

त्यांच्यामागे त्यांची पत्नी, पांच मुलगे आणि दोन मुली आहेत.





## स्व. व्यंकटेश कृष्णा वेरेकर

स्व. व्यंकटेश कृष्णा वेरेकर यांचा जन्म १ ऑक्टोबर १९१३ रोजी सासष्टी तालुक्यातील वेर्णा येथे झाला. त्यांनी मराठीतून माध्यमिक शिक्षण घेतले. १९४४-४५ पर्यंत ते गोवा सेवा संघाचे सदस्य होते. १९४६ पासून ते नॅशनल कॉंग्रेस गोवाचे सदस्य होते.

लोकांमध्ये सामाजिक जागृती निर्माण करण्याचे कार्य त्यांनी केले. तसेच करमणे भागात् शिक्षण सुविधा उपलब्ध करुन देण्याचे प्रयत्न त्यांनी केले आणि विद्यार्थ्यांना आर्थिक मदत दिली. १८ जून १९४६ साली मडगाव येथे जेव्हा पोर्तुगीज पोलीसांनी डॉ. लोहिया यांच्यावर बंदूक रोखून ठेवली तेव्हा ते तिथे धावून गेले व डॉ. लोहिया यांच्यापुढे उभे राहिले. त्यांची दोन वर्षाची मुलगी मृत्यूच्या वाटेवर असतानाही आणि त्यांना अटक होण्याची पूर्ण माहिती असताना देखील बंदीचा हुकूम मोडून त्यांची १८ ऑक्टोबर १९४६ साली फोंडा येथे जाहीर सभा घेतली. अटक होण्याच्या आदी मुलीच्या मृत्यूची बातमी त्यांना मिळाली. त्यांना अटक करुन ट्रिब्युनलासमोर उभे करण्यात आले. न्यायाधिशानी त्यांना पुढे मुक्ती चळवळीत सहभागी न होण्याचे वचन दिल्यास मुलींच्या अंतिम संस्कारास हजर राहण्याची परवानगी दिली जाईल असे सांगितले. त्यांनी तसे करण्यास नकार दिला त्यामुळे ते हजर राहू शकले नाही. तुरुंगवासात त्यांचा शारीरिक छळ झाला.

माधव पंडित, गजानन रायकर आणि फेलिसिया कार्दोज तसेच वसंत कारे हे त्याचे सहकारी होते.

५ ऑक्टोबर १९७३ साली त्यांचा मृत्यू झाला.





## स्व. यादवेंद्र वासुदेव प्रभूदेसाई

स्व. यादवेंद्र वासुदेव प्रभूदेसाई यांचा जन्म २५ जानेवारी १९३० रोजीं सासष्टी तालुक्यातील कुंक्कळी येथे येथे झाला. त्यानी पोर्तुगीज, मराठी आणि हिंदीतून प्राथमिक शिक्षण आणि एस. एस. सी. शिक्षण घेतले. १९५३ ते १९५५ पर्यत ते नॅशनल काँग्रेस गोवाचे सक्रीय कार्यकर्ते होते. १९५६ साली ते गोवा लिबरेशन आर्मीचे सदस्य झाले. पिटर आल्वारीस, आगुस्तस आल्वारीस आणि उर्सुलिनो आल्मेदा यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी कार्य केले. त्यांनी सरकारी नोकरी सोडून मडगांव येथे प्रिटींग प्रेस सुरू केला. देशभक्तीवर पुस्तिका, पत्रके छापून आणि त्यांचे वितरण करून मुक्ती चळवळीस त्यांनी हातभार लावला. त्यांना अटक करून त्यांचा प्रिटिंग प्रेस जप्त केला. त्यांना ट्रिब्युनलासमोर उभे करून आठ वर्षे कठोर शिक्षा आणि दंड भरला नाही तर आणखी दोन वर्षे तुरुंगवास झाला. त्यांना वीस वर्षासाठी नागरी हक्कापासून वंचित करण्यात आले. पण ऑगस्ट १९५९ साली साडेतीन वर्षे तुरुंगवासानंतर त्यांची पॅरोलवर सुटका करण्यात आली. तथापि स्वातंत्र्य मिळेपर्यत दरदिवशी केपे पोलीस स्टेशनवर हजर रहावे लागत होते. केंद्र सरकारने त्यांना ताम्रपत्र देऊन त्यांना सन्मान केला. १९७७ साली ते केपे नगरपालिका मंडळावर निवडून आले.

कुमुदचंद व्ही. पी. देसाई, शांता शिरवईकर, नामदेव रायकर, नर्मदा प्रसाद शर्मा, गुणी जांबावलीकर, बाळा जांबावलीकर, वसंत मोळये हे त्यांचे सहकारी होते.

ते व्यवसायाने शेतकरी होते.



## स्व. सदानंद भिकाजी बोंदे



स्व. सदानंद भिकाजी बोंद्रे यांचा जन्म बार्देश तालुक्यांतील कळंगुट येथे झाला. त्यांनी मराठी आणि पोर्तुगीज भाषेत शिक्षण घेतले. ते आझाद गोमंतक दल आणि क्विट गोवा संघटनेचे सदस्य होते.

त्यांनी राष्ट्रवादी कारवायानी भाग घेतला. त्यांना अटक करून पाच महिन्याहून अधिक तुरुंगाची शिक्षा झाली. तुरुंगात त्यांना बेदम मारहाण करण्यात आली.

महाबळेश्वर नाईक, गोविंद कर्पे आणि मित्रा बीर हे सहकारी होते.



## स्व. गोविंद गणेश जोशी



स्व. गोविंद गणेश जोशी हे तोरसे पेडणे येथील पूजारी असून तेथील लोकांशी त्यांचा संपर्क येतो.

ते स्वत: स्वातंत्र्य चळवळीत सामील झाले. बांदा येथून बॅनर्स, पोस्टर्स आणि इतर राष्ट्रवादी साहित्य आणण्याचे काम त्यांनी केले आणि ते गोव्यातील मोपा आणि इतर ठिकाणी वाटण्याचेही काम त्यांनी केले.

राम आबाजी परब, केशव परब, विश्राम तांडेल, पंढरीनाथ शिरोडकर हे त्यांचे सहकारी.

१९५४ साली तोरसे येथील निवासस्थानी त्यांना अटक झाली. सुमारे दीड वर्षाची त्यांना कैदेची शिक्षा झाली.

३० जून १९९५ रोजी वयाच्या ६५ व्या वर्षी त्यांचे निधन झाले.

# हयात

## श्री. आनंद उर्फ मुकुंद वासु
## शेटये



श्री. आनंद उर्फ मुकुंद वा शेटये यांचा जन्म २१ ऑक्टोबर, १ साली फोंडा येथे झाला. त्यांनी म पोर्तुगीज आणि इंग्रजीतून प्राथमिक शि घेतले. त्यांनी प्रभातफेरीत भाग तसेच पोस्टर चिकटवले, पत्रके वा गुप्त बैठका घेतल्या. त्यांनी मुक्ती चळ भाग घेतल्यामुळे त्यांना सेवेतून काढ आले. पोलीसांनी त्यांच्या घराची झडती घेऊन राष्ट्रवादी साहित्य, बावटे जप्त केले आणि त्यांच्या वडिलांचा छळ केला.

नागेश नायक, सदानंद बोरकर आणि विष्णू कासरकर हे सहकारी होते.



## श्री. आंतोनियो परेरा

कुंकळ्ळी येथील श्री. आंतो परेरा लहान वयातच मुक्ती चळव सहभागी झाले. त्यांचे मेहुणे श्री. आगियार अगोदरच चळवळीत होते.

श्री. परेरा हे स्वतः छायाचित्र असून पोर्तुगीज ठिकाणांची तसेच त्य कार्याची त्यांची छायाचित्रे घेऊन ती राष्ट्र नेत्यांना वाटण्याची कामे त्यांनी केली. पोस्टर चिकटविणे, पत्रके वा तसेच असोल्णा, वेळ्ळी, चिंचणी, कुंकळ्ळी, भिवसा याठिकाणी भू कारवायात ते सहभागी झाले. राजाराम देसाई, खुशाली देसाई हे इतर सहकारी होते.



## श्री. चंद्रकांत लक्ष्मण वेळीप

श्री. चंद्रकांत लक्ष्मण वेळीप यांचा जन्म १५ जून, १९३८ साली काणकोण तालुक्यातील महालवाडा पैंगीण येथे झाला. त्यांनी एसएससी पर्यत शिक्षण घेतले. ते नॅशनल कॉंग्रेस गोवाचे सदस्य होते. माजाळी आणि आंगडी येथे आयोजित केलेल्या बैठकीस ते हजर राहिले. पोस्टर आणि पत्रके आणून गोव्यात वाटली. १७ फेब्रुवारी, १९५५ साली काणकोण पोलीस स्टेशनवर सिंधुताई देशपांडे, वामन पैंगीणकर आणि इतर स्वातंत्र्यसैनिकांच्या सहकार्याने त्यांनी सत्याग्रह घडवून आणला. त्यांना अटक करुन निर्दयपणे मारहाण करण्यात आली. ते वयाने लहान असूनसुध्दा त्यांना ६ वर्षे तुरुंगवासाची शिक्षा करण्यात आली. ३० जानेवारी, १९५८ साली त्यांची सुटका करण्यात आली.

केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

विश्वनाथ लोलयेकर, विश्वंभर लोलयेकर, रामदास लोलयेकर, यशवंत लोलयेकर, बालाजी पी. देसाई आणि ए. देसाई हे त्यांचे सहकारी होते.



## श्री. हरिश्चंद आर. कार्बोटकर



श्री. हरिश्चंद्र आर. कार्बोटकर यांचा जन्म १९३५ साली बार्देश तालुक्यातील बिठ्ठोण येथे झाला. त्यांनी एसएससी पर्यंतचे शिक्षण घेतले. तसेच त्यांनी पोर्तुगीज भाषेत प्राथमिक शिक्षण घेतले. १९५४ साली ते आझाद गोमंतक दलात सामील झाले. तेव्हापासून ते दलाचे सक्रीय सदस्य होते. त्यांचे घर पर्वरी डोंगराजवळ असल्याने दलाच्या कमांडोना लपून राहण्यास सूरक्षित जागा होती. त्यांच्या आईवडिलांनी तसेच कुटुंबातील इतर सदस्यांनी शस्त्रे व दारुगोळा एका ठिकाणाहून दुस-या ठिकाणी नेण्यास मदत केली. आणि अशारीतीने मुक्ती चळवळीस हातभार लावला. बांबोळी येथील रेडिओ स्टेशनवर हातबॉम्ब फेकण्यासाठीच्यो योजनेची आखणी त्यांच्या घरातून केली. त्यांच्याविरुध्द अटक वॉरंट काढण्यात आले. पण ते भूमीगत झाले आणि मुक्तीपर्यत आपल्या कारवाया चालूच ठेवल्या.

ते व्यवसायाने दुकानदार आहेत.



## श्री. जिवा भागडू गांवकर



श्री. जिवा भागडू गांवकर १९५४ साली मुक्ती चळवळीत सहभागी झाले. गोव्यात राष्ट्रीय कॉंग्रेसची स्थापना होऊन आंगडी-माजाळी येथे शिबिरे आयोजित करण्यात आली होती. मनोहर प्रभूदेसाई हे शिबीराचे प्रमुख होते. त्या सुमारास त्यांचा संपर्क परशुराम गोविंद फळ, पिटर आल्वारिस यांच्याशी आला. त्यामुळे त्यांना सत्याग्रहात सामील होण्याची प्रेरणा मिळाली.

श्री. गांवकर १७ फेब्रुवारी १९५५ रोजीं काणकोण येथे श्री. विश्वनाथ लोलयेकर यांच्या नेतृत्वाखाली इतर सहकाऱ्यासमवेत सत्याग्रहात सामील झाले. पोर्तुगीज पोलीसांना या सत्याग्रहाची जाणीव होती. पोलिसांनी काणकोण येथे सत्याग्रहीना अडविले. त्यांच्याकडून ध्वज काढून घेतले. त्यांना मारहाण केली आणि पोलीस स्टेशनवर घेऊन गेले.

श्री. गांवकर यांना ट्रिब्युनलासमोर उभे करून सहा महिने तुरुंगाची शिक्षा झाली. १५ वर्षे राजकीय हक्कापासून त्यांना वंचित करण्यात आले.

त्यांना अल्तिन येथील पोलीस कैदेत सुमारे एक महिना ठेवण्यात आले. त्यानंतर आग्वाद येथे हलविण्यात आले.

३० जानेवारी १९५८ साली त्यांच्या शिक्षेत सुट देऊन त्यांची सुटका करण्यात आली.

मुक्तीनंतर पंचायत आणि इतर संघटनानी त्यांचा सन्मान केला.

सध्या ते आपली पत्नी आणि पाच मुलींसमवेत गावडोंगरी काणकोण येथे राहतात.

# श्री. काशिनाथ परशुराम कोळगांवकर



श्री. काशिनाथ परशुराम कोळगांवकर यांचा जन्म ४ मार्च १९३५ साली तिसवाडी तालुक्यातील सांताक्रुझ येथे झाला. त्यांनी मराठीतून प्राथमिक शिक्षण घेतले. ते आझाद गोमंतक दलाचे सदस्य होते. स्वातंत्र्य सैनिकांना त्यांनी शस्त्रे पुरविली. तिरंगा फडकविला, पोस्टर चिकटविले. १४ ऑगस्ट १९५५ रोजी त्यांना अटक करून तुरुंगांत ठेवण्यात आले. तुरुंगांत त्यांना मारहाण करण्यात आली. २६ ऑक्टोबर १९५६ राजीं त्यांची तुरुंगातून सुटका झाली.

१९७३ साली केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

ते सरकारी सेवेत होते.



# श्री. कांता गोपी घाटवळ



श्री. कांता गोपी घाटवळ यांचा जन्म १ मे १९३६ साली झाला. चौथीपर्यंत त्यांनी मराठीतून शिक्षण घेतले.

त्यांचे भाऊ सिताराम हे १९५० पासून मुक्ती चळवळीत होते. श्री. विश्वनाथ लवंदे, प्रभाकर सिनारी कृष्णराव राणे, कान्होबा नाईक, आत्माराम मयेकर, शांताराम गावस हे सहकारी होते.

१९५४ साली ते आझाद गोमंतक दलात सामील झाले व त्यांनी मुक्ती चळवळीत भाग घेतला. त्यांनी दिपगृह, ज्वाला आणि इतर राष्ट्रवादी साहित्य वाटण्याचे काम केले.

मार्च १९५६ साली आमडगाव येथील सीमेवर असलेल्या शिबीरात सामील होताना त्यांच्यावर पोलीसांनी गोळीबार केला.

पण ते सुरक्षित शिबिरात पोचले. शिरगांव खाण तसेच इतर कारवायात ते सहभागी झाले. ते गोव्याबाहेरील शिबिरात राहिले आणि मुक्तीनंतर गोव्यांत परतले.

मुक्तीनंतर ते शिरगांव-मुळगांव पंचायतीत निवडून आले. गोव्याबाहेरील शिबीरात ते सहभागी झाले.



## श्री. कृष्णा देवप्पा देसाई



श्री. कृष्णा देवप्पा देसाई यांचा जन्म २५ डिसेंबर, १९३१ साली काणकोण तालुक्यातील नगर्से येथे झाला. त्यांनी मराठी आणि पोर्तुगीज भाषेतून प्राथमिक शिक्षण घेतले. ते नॅशनल काँग्रेस गोवाचे सदस्य होते. त्यांनी पोस्टर वाटण्याचे काम केले. माजाळी शिबिरातील स्वातंत्र्यसैनिकांना पोलीसांच्या कारवाईची त्यांनी माहिती दिली. १७ फेब्रुवारी, १९५५ साली आपल्या १३ सहकां-यांसह तिरंगी ध्वज घेऊन आणि देशभक्तीची घोषणा देत गावडोंगरी ते काणकोण पोलीस स्टेशनपर्यत त्यांनी मोर्चा काढला. त्यांना अटक करुन ५ वर्षे ७ महिने तुरुंगवासाची शिक्षा झाली. तुरुंगवासात त्यांना निर्दयपणे मारहाण करण्यात आली. तुरुंगवासात वाईट स्थितीबद्दल तक्रार केल्यामुळे शिक्षा म्हणून सात दिवस अंधारात ठेवण्यात आले. केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

मनोहर देसाई, राया काळे आणि शिवा देसाई हे त्यांचे सहकारी होते.

ते व्यवसायाने शेतकरी आहेत.





# श्री. मधुकर बाळसो नाईक देसाई

श्री. मधुकर बाळसो नाईक देसाई यांचा जन्म १५ मार्च, १९३४ रोजीं सासष्टी तालुक्यातील कुंक्कळी येथे झाला. त्यांनी मराठी आणि पोर्तुगीज भाषेतून प्राथमिक आणि एस. एस. सी. पर्यतचे शिक्षण घेतले. ते आझाद गोमंतक दलाचे सदस्य होते. १९५३ पासून त्यानी राष्ट्रवादी कारवायानी भाग घेण्याचे त्यांनी चालूच ठेवले. त्यांनी पत्रके वाटणे, पोस्टर चिकटविण्याची कामे केली. राष्ट्रदिनी तिरंगा फडकाविला. माजाळी शिबिरातील आझाद गोमंतक दलाच्या नेत्यांना पोर्तुगीज सरकारच्या कारवायाची गुप्त माहिती दिली. १६ एप्रिल, १९५५ साली त्यांना अटक झाली. त्यांना तुरुंगवासात ठेवण्यात आले.

मार्च, १९५५ साली त्यांची सुटका करण्यात आली. केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला. मधुकर गणेश तळावलीकर, दत्ताराम देसाई, प्रभाकर वैध, नारायण नाईक, शाबू देसाई, खुशाली देसाई आणि अनंत देसाई हे त्याचे सहकारी होते.

ते सरकारी सेवेत होते.



# मोहन विष्णू शेट दांते



श्री. मोहन विष्णू शेट दांते यांचा जन्म ५ मे १९३८ रोजी गोवा वेल्हा येथील गावकरवाडा भाटी येथे झाला. ६२ वर्षाचे श्री. मोहन दांते सध्या कुडका येथे राहतात.

ते नॅशनल काँग्रेस गोवाचे सदस्य होते. त्यांनी पिटर आल्वारीस यांच्या नेतृत्वाखाली मुक्ती चळवळीत भाग घेतला.

सुरूवातीस काशीनाथ गोवेकर यांच्याकडे त्यांचा संपर्क आला. गोवेकर यांनी ऑगस्ट १९५५ साली पुणेच्या सिंधु देशपांडे यांच्या नेतृत्वाखाली सत्याग्रहात सहभागी होण्यास सांगितले. परंतु सिंधु देशपांडे यांना अटक झाली.

दत्ता येसू नाईक, खुशाली रामा मडकईकर आणि इतरांबरोबर श्री. दांते यांनाही अटक झाली.

त्यांना पणजीतील पोलीस कैदेत आठ दिवस ठेवण्यात आले आणि नंतर सोडून देण्यात आले.

मुक्तीनंतर ते सरपंच झाले.

सध्या ते कुडका येथे आपल्या कुटुंबासमवेत राहतात.





## श्री. नारायण धर्मा सप्ते

श्री. नानायण सप्ते यांचा जन्म २७ ऑगस्ट, १९४१ रोजी बार्देश तालुक्यातील म्हापसा येथे झाला. त्यांनी मराठीतून प्राथमिक शिक्षण घेतले. ते नॅशनल कॉंग्रेस गोवाचे सदस्य होते. २६ जानेवारी, १९५५ रोजी त्यांनी म्हापसा येथे सत्याग्रह केला. तेव्हा त्यांना अटक करुन तुरुंगवासात ठेवण्यात आले. २७ ऑगस्ट, १९५९ साली त्यांची तुरुंगवासातून सुटका करण्यात आली.

केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्याचा सन्मान केला.

रामेश्वर लांजेकर, प्रभाकर तिवरेकर, शामसुंदर नायक, अनिल बुर्ये, रविंद्र सिरसाट, वसंत मांद्रेकर आणि प्रभाकर हळदणकर हे त्यांचे सहकारी होते.

ते व्यवसायाने कासार आहेत.



# श्री. नरहरी यशवंत हेदे



श्री. नरहरी यशवंत हेदे यांचा जन्म ७ जुलै १९३५ रोजी झाला. त्यांचे शिक्षण एस. एस. सी. पर्यंत झाले.

लहान वयात त्यांनी स्वामी विवेकानंद यांची पुस्तके वाचली आणि त्या पुस्तकांपासून त्यांनी प्रेरणा घेतली.

तद्नंतर त्यांचा संपर्क श्री. चंद्रकांत केंकरे, श्री. जयकृष्ण शिरोडकर यांच्याशी आला. त्यांनी सत्याग्रहात सामील होण्याचा निर्णय घेतला परंतु सत्याग्रहापूर्वीच श्री. केंकरे आणि शिरोडकर यांच्याबरोबर त्यांना अटक झाली. त्यांना पणजीच्या तुरुंगात ६ महिन्याची शिक्षा झाली व नंतर त्यांची सुटका करण्यात आली.

तीन चार महिन्यानंतर शिरोडा येथील पोर्तुगीज शाळा इतर कांही राष्ट्रवाद्यांकडून जाळण्यात आली. श्री. हेदे यांना संशयावरून अटक करून बेदम मारहाण करण्यात आली. श्री. हेदे यांनी पोर्तुगीज पोलीसांना सांगितले की ते सत्याग्रही असून यासारख्या हिंसात्मक कार्यात ते सहभागी होत नाहीत. तीन आठवड्यानंतर त्यांची सुटका करण्यांत आली.

ते सध्या कुर्टी फोंडा येथे आपल्या कुटुंबासमवेत राहतात.





## श्री. प्रभाकर नारायण शेणवी मथा

श्री. प्रभाकर मथा यांचा जन्म २ डिसेंबर १९३२ रोजी ताळगांव येथे झाला.

मडगांवा येथे एस. एस. सी. पर्यत शिक्षण घेतले. विद्यार्थीदशेत असताना डॉ. राम मनोहर लोहिया यांच्याकडून स्फूर्ती घेऊन इतर विद्यार्थ्यांबरोबर ते चळवळीत सामिल झाले. त्यानी मडगांव येथे सत्याग्रह केला.

ते आपले बंधु रामनाथ यांच्याबरोबर रहात असत. आपले बंधु प्रभाकर मुक्ती चळवळीत आहे हे समझल्यानंतर त्यांनी प्रभाकर याना घर सोडण्याचा सल्ला दिला. प्रभाकर घर सोडून दामोदर कारवारकर यांच्या घरी वास्तव्याला गेले आणि त्यानी आपल्या राष्ट्रवादी कारवाया चालूच ठेवल्या.

ते झेंडे, राष्ट्रवादी साहित्य आणि पत्रकें वेगवेगळ्या ठिकाणी लोकांना वितरीत करीत असे.

२ जुलै १९५४ रोजी चांदर येथे जंगलात लपून राहिलेल्या प्रभाकर सिनारी, प्रभाकर वैद्य आणि इतरांना नेण्यासाठी रॉक सांतान फर्नांडिस यानी मथा याना बोलावले. त्याना गाडीतून नेताना चांदर येथे पोलीसानी गाडी अडवली. इतर पळून गेले. पोलिसानी गाडीत कोण होते याची विचारपूस करुन मथा याना मारहाण केली आणि गोळ्या घातल्या. ते बेशूध्द पडले. त्याना मडगांव पोलिस स्टेशनवर आणि नंतर रायबंदर हॉस्पिटलमध्ये नेण्यात आले तेथे त्यानी १ महिना २३ दिवस उपचार घेतले.

नंतर पोलिसांनी त्यांची जबानी घेऊन आग्वाद तुरुंगात रवानगी केली.

१९५७ साली त्यांची मुक्तता झाली. श्री. मथा सध्या बोरी येथे वास्तव्य करुन आहेत.





## श्री. रघुनाथ परशुराम कोळगांवकर

श्री. रघुनाथ परशुराम कोळगांवकर यांचा जन्म ५ ऑक्टोबर १९२७ रोजी बार्देश तालुक्यातील कांदोळी येथे झाला. त्यांनी मराठीतून प्राथमिक शिक्षण घेतले. ते आझाद गोमंतक दलाचे सदस्य होते. त्यांनी शस्त्रांची वाहतूक केली, तिरंगा फडकाविला. पोस्टर चिटकविले. १४ ऑगस्ट १९५५ रोजी त्यांना अटक करून तुरुंगात ठेवण्यात आले. सतरा महिने त्यांना तुरुंगवासाची शिक्षा झाली.

१९७३ साली केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

ते सरकारी सेवेत होते.



# श्री. रविंद वासुदेव सिरसाट



रविंद्र वासुदेव सिरसाट यांचा जन्म २७ नोव्हेंबर १९३० रोजी कळंगुट बार्देश येथे झाला.

ते स्वत: मुक्ती चळवळीत सहभागी झाले. नॅशनल कॉंग्रेसचे सदस्य म्हणून त्यांनी पिटर आल्वारीस यांच्या नेतृत्त्वाखाली कार्य केले. २६ जानेवारी १९५५ साली त्यांनी सत्याग्रह घडवून आणला. त्यांना अटक करुन ट्रिबुनलासमोर उभे करण्यात आले. त्यांना १२ वर्षाची तुरुंगाची शिक्षा झाली. परंतु २७ ऑगस्ट १९५९ रोजी त्यांची सुटका झाली.

ते इंडियन नॅशनल कॉंग्रेस बार्देश शाखेचे सचिव होते. ते प्रदेश कॉंग्रेस समितीचेही सदस्य होते. १९४६ साली खासदार नाथ पै यांच्या मार्गदर्शनाखाली स्थापना केलेल्या विद्यार्थी संघटनेचे ते सदस्य होते. या संघटनेने दत्तवाडी म्हापसा येथे सुषमा बाल वाचनालय आणि अस्नोडा येथे सुभाष बाल वाचनालय या नावाने वाचनालय सुरु केले.

मुक्तीनंतर विद्यार्थी संघटनेचे रुपांतर म्हापसा युवक संघ असे केले. ते या संघाचे खजिनदार होते.

वार्ड क्र. ३ मधून म्हापसा नगरपालिकेवर ते नगरसेवक म्हणून निवडून आले. अखिल भारतीय स्वातंत्र्यसैनिक संघटनेचे ते उपसचिव होते

ते एक समाजसेवक आहेत. त्यांचा विविध सामाजिक संस्थेकडे संपर्क आहे.

सध्या ते अन्साभाट म्हापसा येथील सिरसाटवाडा येथे राहतात.



## श्री. राजाराम येसो देसाई



श्री. राजाराम येसो देसाई यांचा जन्म २१ डिसेंबर १९३५ रोजीं कुंकळ्ळी येथे झाला.

मुरीडा कुंकळी येथील एमपीएस शाळेत शिकताना ते व त्यांचे इतर वर्गमित्र पिटर आल्वारीस यांच्या संपर्कात आले. नॅशनल कॉंग्रेस मध्ये तरुण सदस्यांना सामील करण्यासाठी त्यांनी पुस्तिका दिल्या.

श्री. देसाई १९५३ - ५४ साली राष्ट्रीय कॉंग्रेस गोवाचे सदस्य झाले. काही काळ त्यांनी तिथे काम केले. त्यानंतर आझाद गोमंतक दलात सामील झाले आणि हिंसात्मक कारवायात त्यांनी भाग घेतला. त्याच रात्री त्यांना अटक झाली व नंतर त्यांची सुटका करण्यात आली. परत दुस-या दिवशीही त्यांना अटक झाली व एका महिन्याची शिक्षा झाली.

नंतर ते माजाळी येथील कॅम्पमध्ये सामील झाले आणि तिथेच राहिले.

साळजिनी मिलिटरी पोस्ट, पोळे कस्टम चेक पोस्ट कारवाईत ते सहभागी झाले.

१९६१ साली ते मिलिटरी समवेत गोव्यात आले.

अध्या ते मुरीडा कुंकळ्ळी येथे आपल्या कुटुंबियांसमवेत राहतात.





## श्री. रघुनाथ गणेश गारुडी देसाई

श्री. रघुनाथ गणेश गारुडी देसाई यांचा जन्म २२ एप्रिल, १९०९ साली बार्देश तालुक्यातील शिवोली येथे झाला. त्यांनी मराठीतून प्राथमिक शिक्षण घेतले. ते आझाद गोमंतक दलाचे सदस्य होते. त्यांनी मिरवणुका, बैठकांनी भाग घेतला. तिरंगी ध्वज फडकाविला. पत्रके वाटली, चोडण पोलीस स्टेशनवर हल्ला करुन शस्त्रे व दारुगोळा जप्त केले. त्यांना दोन वेळा अटक करुन ६ महिने तुरुंगवासात ठेवण्यात आले.

१५ ऑगस्ट, १९७२ साली केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

गणपत सावईवेरेंकर, सिताराम कुबल, रामदास चाफडकर, दिगंबर हळर्णकर, नानी भोसले, बापू मोहिते, निपाणीकर, माधव कोरडे, गोविंद हळर्णकर, रंगा खोर्जुवेकर आणि कृष्णा वांयगणकर हे त्यांचे सहकारी होते.

ते व्यवसायाने सुतार आहेत.



# श्रीपाद नरहरी खरंगटे



श्री. श्रीपाद नरहरी खरंगटे यांचा जन्म २२ नोव्हेंबर, १९४० साली सासष्टी तालुक्यातील करमणे येथे झाला. त्यांनी मराठीतून माध्यमिक तर पोर्तुगीज भाषेतून प्राथमिक आणि एस एस सी पर्यंतचे शिक्षण घेतले. ते सुरुवातीस नॅशनल कॉंग्रेस गोवाचे, त्यानंतर गोवा लिबरेशन आर्मी आणि आझाद गोमंतक दलाचे सदस्य हेते. १९५४ साला जांबावली, केपे येथे झालेल्या नॅशनल कॉंग्रेस गोव्याच्या शिबिरास हजर होते. पोस्टर चिकटविणे, तिरंगा फडकाविणे इत्यादी कामे त्यांच्यावर सोपविण्यात आली. १५ ऑगस्ट, १९५५ साली त्यांनी मडगाव येथील नगरपालिका उद्यानात सत्याग्रह केला. त्यांना अटक करुन तुरुंगात ठेवण्यात आले. १५ सप्टेंबर, १९५५ साली पोलीस स्टेशनवर हजेरी लावण्याच्या अटीवर त्यांची सुटका झाली. पोलीसांकडून होणारा छळ चुकविण्यासाठी ते मोपा येथून सीमा पार करुन गोव्याबाहेर गेले. आझाद गोमंतक दलाच्या कार्यकर्त्यांनी खाण व पोलीस स्टेशनवर हल्ले करुन जप्त केलेली शस्त्रे आणि दारुगोळा साठविण्यासाठी मडगाव येथे दोन खोल्यां भाडयाने घेतल्या. नेत्यांना पोलीस कारवायांची माहिती दिली. वास्को हार्बर, कुळे रेल्वे स्टेशन, घोगळ येथील मिलिटरी गेरेज आणि रायबंदर ते दिवाडी पोलीस अधिका-यांना घेऊन येणा-या फेरीत बॉम्ब ठेवले. कुठ्ठाळी येथील सरकारी गोदाम आणि मडगांव येथील तांत्रिक शाळेच्या इमारतीला आग लावली. बाणस्तारी पुलावरील दोन पोलीस रक्षकांवर हल्ला केला. त्यांना अटक करुन दोनदा न्यायालयासमोर उभे केले आणि १४ वर्षे तुरुंगवासाची शिक्षा दिली. परंतु १९६० साली त्यांची सुटका करण्यात आली. नंतर अटक चुकविण्यासाठी ते नेतुर्ली येथे पळून गेले आणि तेथून दांडेली येथे गेले व बेळगाव येथे आझाद गोमंतक दलाच्या शिबीरात सहभागी झाले. मुक्तीपर्यंत त्यांनी भूमिगत कारवायांनी भाग घेतला.



# श्रीधर अनंत पैगिणकर



श्री. श्रीधर अनंत पैगिणकर यांचा जन्म ४ जून, १९३२ साली काणकोण तालुक्यांतील पैंगिण येथे झाला. त्याचे एसएससी पर्यंतचे शिक्षण झाले. २३ जानेवारी, १९५५ रोजीं त्यांनी येथे सत्याग्रह केला. त्यांना अटक करून मारहाण करण्यात आली आणि १२ वर्षे तुरुंगवासाची शिक्षा झाली. ४ वर्षे ९ महिन्यानंतर त्यांची तुरुंगवासातून सुटका करण्यात आली.

केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

ते व्यवसायाने शिक्षक आहे.

# श्री. श्रीकांत रामदास नायक करमली



श्री. श्रीकांत रामदास नायक करमली यांचा जन्म १८ सप्टेंबर, १९३८ साली केपे तालुक्यातील काकोडा येथे झाला. त्यांनी मराठीतून प्राथमिक शिक्षण घेतले. ते नॅशनल काँग्रेस गोव्याचे सदस्य होत. त्यांनी त्यांचा मोठा भाऊ श्री. नागेश करमली यांना त्यांच्या कारवायात मदत केली. पोस्टर चिकटविणे, पत्रके वाटणे अशी कामे त्यांनी केली. १५ सप्टेंबर, १९५४ साली केपे न्यायालयासमोर त्यांनी तिरंगा फडकाविला. १७ सप्टेंबर, १९५४ साली त्यांना अटक करण्यात आली. पोलीस कैदेत त्यांना बेदम मारहाण करण्यात आली. वयाने लहान असल्याकारणाने १२ ऑक्टोबर, १९५४ साली त्यांची सुटका करण्यात आली. सुटका झाल्यानंतर त्यांनी भुमीगत कारवायानी भाग घेण्याचे चालूच ठेवले.

प्रभाकर भेंब्रे, गुणी जांबावलीकर, आणि नरसिंह हेगडे देसाई हे त्यांचे सहकारी होते.



## श्री. शिवराम सूभा साळगांवकर

श्री. शिवराम सूभा साळगांवकर यांचा जन्म १० मे, १९३१ साली तिमवाडी तालुक्यातील सांताक्रुझ येथे झाला. त्यांनी मराठीतून प्राथमिक शिक्षण घेतले. ते आझाद गोमंतक दलाचे सक्रीय सदस्य होते. त्यांनी आझाद गोमंतक दलाच्या नेत्यांना पोलीस आणि लष्कर अधिकाऱ्यांच्या करवाईची माहिती दिली. त्यांनी स्वातंत्र्यसैनिकांना अन्न व निवारा दिला. लोकांमध्ये राजकीय जागृती निर्माण करण्यासाठी त्यांनी प्रचार केला. १४ ऑगस्ट, १९५५ रोजी त्यांना अटक करण्यात आली व १० वर्षे तुरुंगवासाची शिक्षा झाली. तुरुंगवासात त्यांना बेदम मारहाण झाली. २२ ऑगस्ट, १९५९ रोजी त्यांची सुटका झाली. मुक्तीनंतर ते इंडियन नॅशनल काँग्रसचे सदस्य झाले आणि १९७७ पासून ते जनता पार्टीचे व नंतर जनता दलाचे सदस्य आहेत.

१९७२ साली केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

गोवा वेल्हा पंचायतीचे ते सरपंच आणि सदस्य होते.

ते व्यवसायाने ड्रायव्हर आहेत.

# श्री. शांबा पुंडलिक तिळ्वे



श्री. शांबा पुंडलिक तिळवे यांचा जन्म १५ जून, १९३७ रोजी सांगे तालुक्यातील शामेल-किलर्पाल येथे झाला. त्यांनी मराठीतून प्राथमिक शिक्षण घेतले. ते आझाद गोमंतक दलाचे सदस्य होते. राष्ट्रवादी नेत्यांना सीमा पार करण्यासाठी मदत केली. गावक-यांना मुक्ति चळवळीत सहभागी करून घेण्यासाठी त्यांना प्रेरणा देण्याचे काम त्यांनी केले. १३ डिसेंबर, १९५६ रोजी त्यांना अटक झाली आणि १८ महिने त्यांना तुरुंगवासात डांबण्यात आले.

१९७२ साली केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला.

खुशाली देसाई, टोनी फर्नांडिस, रजनीकांत केंकरे, बापू सहकारी, मुकुंद पवार आणि रामकृष्ण सहकारी हे त्यांचे सहकारी होते.



# श्री. तुकाराम सुखा आगरवाडेकर

श्री. तुकाराम सुखा आगरवाडेकर यांचा जन्म ८ जून, १९२० साली बार्देश तालुक्यातील शिवोली येथे झाला. १९५४ पासून ते आझाद गोमंतक दलाचे सदस्य होते. त्यांनी पत्रके वाटण्याचे काम केले. नेत्यांना माहिती दिली. प्रभाकर सिनारी आणि विश्वनाथ लवंदे यांच्या नेतृत्वाखाली हल्ला करण्याच्या कार्यात ते सहभागी झाले. कॅसलरॉक ट्रॉली, हणखणे, माजाळी आणि गुळेली आऊट पोस्ट त्यांनी स्फोटकांनी उध्वस्त केले. धाबेल दमण पोलीस आऊटपोस्टवर हल्ले चढविले.

बाळा मापारी, त्याचे भाऊ यशवंत आगरवाडेकर आणि वासुदेव आगरवाडेकर हे त्याचे सहकारी होते.

ते व्यवसायाने शेतकरी आहेत.



## श्री. तुकाराम हरी गांवकर



श्री. तुकाराम हरी गांवकर यांचा ज
८ ऑगस्ट, १९३४ साली डिचो
तालुक्यातील कये येथे झाला. त्यां
मराठीतून प्राथमिक शिक्षण घेतले. १९
साली त्यांनी आत्माराम धाकटू मये
यांच्या नेतृत्वाखाली मये येथील शेतक
आंदोलनात त्यांनी भाग धेतला. १९४५ प
ते नॅशनल कॉंग्रेस गोवाचे सदस्य होते. नं
ते आझाद गोमंतक दलाचे सदस्य होते. आझाद गोमंतक दलाच्या भूमी
चळवळीस मदत केल्यामुळे त्यांनर ३ जून, १९४८ साली अटक करण्य
आली आणि डिचोली पोलीस कैदेत त्यांनर ठेवण्यात आले. चार दिवस
कैदेतून पळून जाण्यास त्यांना यश मिळाले. त्यांनी गोव्याची सीमा
करुन भारत हद्दीत प्रवेश केला. ट्रिब्युनलाने त्यांच्या गैरहजेरीत त्यांच्या
खटला भरला आणि २४ वर्षे त्यांना तुरुंगवासाची शिक्षा ठोठाविली. त्यानं
वझरी येथे प्रशिक्षण पूर्ण करुन ते आझाद गोमन्तक दलाच्या कमांडो दल
सामील झाले. १९५४ साली ते नगरहवेली मुक्ती चळवळीत सहभा
झाले. १९५५ साली ते गोव्यात परतले आणि आझाद गोमंतक दला
वझरे केंद्राची सुत्रे आपल्या हातात घेतली. १९५५-१९६१ पर्यत ते डिचो
सत्तरी आणि तिसवाडी तालुक्यातील विविध कारवायानी सहभागी झा
सोनशी खाणीवर हल्ला, सारमानस येथील पोलीसांना घेऊन जाणा
बसेसवर हल्ला केला, मावळिगे येथे गस्तीवर असलेल्या जीपवर ह
अशा अनेक कारवाईत ते सहभागी झाले. तसेच त्यांनी प्रभाकर व्ही. सिन
यांच्या नेतृत्वाखाली शिरगाव खाण आणि विश्वनाथ एन. लवंदे यां
नेतृत्वाखाली बेती पोलीस स्टेशनवर हल्ला चढविला. केंद्र सरकारने त्य
ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला. तसेच दादरा नगरहवेली सरकारने त्य
मानचिन्ह दिले.

कान्होबा नाईक, सुखदेव शिरोडकर, कृष्णा माईणकर, दत्ता
नागवेकर, यशवंत सुखा आगरवाडेकर हे त्यांचे सहकारी होते.

ते व्यवसायाने सायकल मॅकनिक आहेत.



## श्री. विश्वनाथ पदमाकर सावईकर

श्री. विश्वनाथ पद्‌माकर सावईकर यांचा जन्म फोंडा तालुक्यातील सावईवेरे येथे २४ फेब्रुवारी, १९२५ साली झाला. त्यांनी एस एस सी पर्यंतचे शिक्षण घेतले. ते आझाद गोमंतक दलाचे सदस्य होते. त्यांनी भुमिगत स्वातंत्र्यसैनिकांसाठी अन्न आणि निवा-याची सोय केली. आपल्या घरात पोस्टर ठेवले आणि कुस्तोदियो फर्नांडिस यांचा खून करण्यामागे त्यांचा हात असल्याच्या शंकेने त्यांना सात महिने तुरुंगवासात ठेवण्यात आले.

ते व्यवसायाने शेतकरी आहेत.





## श्री. विनायक सोयरु उसगांवकर

श्री. विनायक सोयरु उसगांवकर यांचा जन्म २६ जुलै, १९३३ साली उसगांव येथे झाला. त्याचे प्राथमिक शिक्षण गोव्यात झाले तर उच्च शिक्षण त्यांनी कर्नाटक येथील हल्ल्याळ येथे घेतले. एस एस सी नंतर बेळगांव येथे त्यांची ओळख बॅरिस्टर नाथ पै, पिटर आल्वारीस यांच्याबरोबर झाली व ते गोवा मुक्ती चळवळीकडे आकर्षित झाले.

१६ ऑगस्ट १९५५ साली पैंगिण येथील एम. ए. मणियार यांच्या नेतृत्वाखाली सत्याग्रहात सहभागी झाले. या ४० सत्याग्रहींच्या गटाला अटक करुर बेदम मारहाण करण्यात आली आणि त्यांना सीमारेषेवर सोडण्यात आले.

त्यानंतर ते गोवा लिबरेशन लष्करात सहभागी झाले. डिचोली येथे झालेल्या कारवाईत ते सहभागी झाले. त्याची ओळख आपा करमळकर यांच्याबरोबर झाली. आपा करमळकर यांच्या गटाला अटक झाली. त्यात ॲड. तांबा, पावसकर आणि इतरांचा समावेश होता. श्री. उसगांवकर यांना त्यांच्या गैरहजेरीत १४ वर्षाची कठोर शिक्षा झाली. त्यानंतर ते मुंबईत गेले आणि १९६८ साली गोव्यात परतले.

केंद्र सरकारने ताम्रपत्र देऊन त्यांचा सन्मान केला. मुक्तीनंतर त्यांनी पर्वरी येथील गोवा हॉटेल मॅनेजमेंट सेस्थेत इन्स्ट्रक्टर म्हणून काम केले.

सध्या ते पर्वरी येथे आपल्या कुटुंबासमवेंत राहतात.

